राज्यातील ११०० पोलीस स्टेशनमध्ये महिला मदत कक्ष (वुमेन हेल्प डेस्क) स्थापन करणे / बळकटीकरण करणे या योजनेकरिता निधी वितरित करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१०२०/प्र.क्र.२७२/विशा-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २३ मार्च, २०२३.

वाचा:- १) गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे दिनांक १०.०१.२०२० रोजीचे, दिनांक १८.०३.२०२० रोजीचे आणि २०.०१.२०२२ रोजीचे पत्र.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १०२०/ प्र. क्र. २७२/ विशा-६, दिनांक २४.०३.२०२२.
३) गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे दिनांक ०२.०३.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

पिडित महिलांच्या मदतीकरिता राज्यातील ११०० पोलीस स्टेशनमध्ये महिला मदत कक्ष (वुमेन हेल्प डेस्क) स्थापन करणे / बळकटीकरण करण्यासाठी रु. ११००.०० लक्ष इतका निधी केंद्र शासनाकडून निर्भया निधी अंतर्गत (१००% केंद्र हिस्सा) प्राप्त झाला आहे. गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी महिला मदत कक्ष स्थापन करणे या योजनेच्या अंमलबजावणीकरिता नॅशनल क्राईम रेकॉर्डस ब्युरो (एनसीआरबी) या संस्थेस सेंट्रल नोडल एजन्सी (सीएनए) घोषित केले असुन सदरील रु. ११०० लक्ष निधी हा सेंट्रल नोडल एजन्सी (सीएनए) च्या खात्यावर जमा करण्याबाबत कळविले आहे. तसेच, सदर योजनेच्या अंमलबजावणीकरिता विशेष पोलीस महानिरीक्षक, म व बा अ प्र वि., मुंबई यांना अंमलबजावणी यंत्रणा घोषित करण्यात आले आहे. त्यानुषंगाने, पिडित महिलांच्या मदतीकरिता राज्यातील ११०० पोलीस स्टेशनमध्ये महिला मदत कक्ष (वुमेन हेल्प डेस्क) स्थापन करणे / बळकटीकरण करण्यासाठी रु. ११००.०० लक्ष इतका निधी नॅशनल क्राईम रेकॉर्डस ब्युरो (एनसीआरबी) या सेंट्रल नोडल एजन्सी (सीएनए) च्या खात्यावर जमा करण्याकरिता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिडित महिलांच्या मदतीकरिता राज्यातील ११०० पोलीस स्टेशनमध्ये महिला मदत कक्ष (वुमेन हेल्प डेस्क) स्थापन करणे / बळकटीकरण करण्यासाठी केंद्र शासनाकडून निर्भया निधी अंतर्गत प्राप्त रु. ११००.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यास आणि खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. विशेष पोलीस महानिरीक्षक, म व बा अ प्र वि., मुंबई तथा अंमलबजावणी यंत्रणा यांनी गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे तसेच, यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे.

३. केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयामार्फत वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग / खर्च हा केंद्र / राज्य शासनाच्या प्रचलित नियमानुसार विहीत पध्दतीने येणा-या किमतीनुसार व लेखाशिर्षनिहाय विहीत करण्यात आलेल्या एकूण वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून व यासंदर्भातील वित्तीय औपचारीकता पूर्ण करून करण्यात यावा.

४. कोणत्याही परिस्थितीत प्राप्त निधी संचित (parking) स्वरूपात ठेऊ नये. यानुषंगाने प्राप्त निधीचा विनियोग झाल्यानंतर विहीत कालावधीत योग्य त्या विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र (utilization certificate) सादर करावे. प्रस्तुत योजनेचे प्राधिकारी म्हणून केंद्रशासनाच्या आवश्यकतेनुसार अंतर्गत लेखापरीक्षणासाठी यासंदर्भातील लेखे अद्ययावत ठेवण्यात यावे.

५. सदर खर्च हा, गृह विभाग, मागणी क्र. बी-१०, ४०५५-पोलीसांवरील भांडवली खर्च, निर्भया निधी योजने अंतर्गत पोलीस स्थानकांत महिला मदत कक्ष स्थापन करणे (१०० केंद्र पुरस्कृत) (कार्यक्रम) ४०५५०३०३, १३-कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदींतून करण्यात यावा.

६. सदर प्रयोजनासाठी या लेखाशीर्षांतर्गत प्राप्त होणारा निधी खाते नं.- ११००७५९२९०९०, शाखा-Canara Bank, Specialised Government Business Branch, Delhi, आयएफएससी कोड- CNRB०००३५२५, या सेंट्रल नोडल एजन्सी (Central Nodal Agency) (CNA) च्या बँक खाती जमा करण्याकरिता सह सचिव /उप सचिव (रोखशाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोखशाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३, दिनांक १६.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशांस अनुसरून आणि वित्त विभागाकडून अनौपचारिक संदर्भ क्र. ११६२२०२/व्यय-७ अन्वये दिनांक २०.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२३१३२९५१३२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL VIJAY KULKARNI

Digitally signed by RAHUL VIJAY KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=31493D4A6291F531ED8FD00972CCBFA0376623C7F6C38C3B848BFBE06685A219, cn=RAHUL VIJAY KULKARNI
Date: 2023.03.23 13:36:15 +05'30'

**( राहुल वि. कुलकर्णी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
५. प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, एन सी आर बी, दिल्ली.
७. अपर पोलीस महासंचालक (नियोजन व समन्वय), म. रा., मुंबई.
८. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९. विशेष पोलीस महानिरिक्षक, मवबाअप्रवि, म. रा., मुंबई.
१०. सह सचिव / उप सचिव (रोख शाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११. सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक (पोलीस महासंचालक, म. रा., मुंबई यांच्या मार्फत).
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. राज्यातील सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१६. प्रभारी पोलीस अधिकारी, संबंधित पोलीस स्टेशन (पोलीस महासंचालक, म. रा., मुंबई यांच्या मार्फत).
१७. व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अर्थसंकल्प शाखा (बीयूडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (विशा-६).